**पदुम सहकारी संस्थांच्या लेखापरिक्षणासाठी निर्माण करण्यात आलेली ४०८ अस्थायी पदे दि.१/३/२०२४ ते दि.३१/८/२०२४ पर्यत पुढे चालू ठेवण्याबाबत...........**

**महाराष्ट्र शासन,**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्र. राजस-२०२४/प्र.क्र.४३/५ स**
मादाम काम मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- १३ मार्च, २०२४

**वाचा :-** १) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.राजस-१००८/प्र.क्र.५३८/५स, दि.५/५/२०११

२) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.राजस-२०२३/प्र.क्र.१०४/५स, दि.२७/९/२०२३

३) सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र जा. क्र.आस्था/कक्ष-४/पदुम/मुदतवाढ/२०२३/२७०६, दि.२१/१२/२०२३

४) वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१/२/२०२४

**शासन निर्णय :-**

पदुम सहकारी संस्थांचे सांविधीक लेखापरीक्षणासाठी निर्माण करण्यात आलेल्या ४०८ अस्थायी पदांना संदर्भाधीन क्र.२ येथील दि.२७/९/२०२३ रोजीच्या शासन निर्णयानुसार दि.२९/२/२०२४ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात आली होती. सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, पुणे यांच्या संदर्भाधीन क्र.३ येथील दि.२१/१२/२०२३ रोजीच्या पत्रान्वये सदर पदांना दि.१/३/२०२४ ते दि.३१/८/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याची विनंती करण्यात आली आहे.

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील स्थायी/अस्थायी पदांच्या आढाव्यानुसार सुधारीत आकृतीबंध निश्चित करुन त्याबाबतचा शासन निर्णय दि.५/५/२०११ रोजी निर्गमित करण्यात आला आहे. सदर आकृतीबंधात वरील पदांचा समावेश आहे. वित्त विभागाच्या दि.१/९/२००४ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार आकृतीबंधाचा दर तीन वर्षानी आढावा घेणे आवश्यक आहे. त्यानुसार शासन निर्णय दि.५/५/२०११ नुसार निर्गमित केलेल्या आकृतीबंधास दि.५/५/२०१४ रोजी तीन वर्षे पूर्ण झालेली आहेत. सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्याबाबतचा प्रस्ताव सहकार आयुक्त यांच्याकडून शासनास प्राप्त झाला होता तो मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तर समितीच्या मान्यतेस्तव वित्त विभागास सादर करण्यात आला असता वित्त विभागाने उपस्थित केलेल्या मुद्दयांच्या अनुषंगाने सुधारित प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्याची कार्यवाही सुरू आहे. सदर कार्यवाहीस काही कालावधी लागणे अपेक्षित आहे. दरम्यानच्या कालावधीत सदर पदांबाबत निर्णय घेणे आवश्यक असल्याने वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.४ येथील दि.२१/२/२०२४ रोजीचा शासन निर्णयास

अनुसरुन सदर पदांना दि.१/३/२०२४ ते दि.३१/८/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. उपरोक्त ४०८ अस्थायी पदांचा कार्यालयनिहाय विगतवारी विशेष कार्य अधिकारी, लेखापरीक्षा मंडळ, पदुम, महाराष्ट्र राज्य, मुंबई हे स्वतंत्ररित्या प्रसृत करतील.

३. सदर पदांच्या वेतन व भत्त्यांवरील खर्च कृषि व पदुम विभागाने “२४०४-दुग्धव्यवसाय विकास (योजनेतर), ००१-संचालक व प्रशासन, (०५) (०१) दुग्ध सहकारी सोसायटीसाठी हिशेब तपासणी मंडळ (२४०४ ०२६१)” या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२०२५ ह्या वर्षासाठी मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय दि.२१/२/२०२४ अन्वये विभागास प्राप्त झालेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्या संगणक सांकेतांक २०२४०३१३११२४३२२७०२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL JAYRAM CHAUDHRY

Digitally signed by ANIL JAYRAM CHAUDHRY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D124AE9BBD15BED87DBD08EF779CF1B85A4020339EB1C2EF0E112FB67063011C, cn=ANIL JAYRAM CHAUDHRY
Date: 2024.03.13 11:33:34 +05'30'

**( अनिल चौधरी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई.
२. मत्स्यव्यवसाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. विशेष कार्यकारी अधिकारी, लेखापरीक्षा मंडळ, पदुम, मुंबई.
४. सर्व सहनिबंधक (लेखापरिक्षण), सहकारी संस्था
५. सर्व जिल्हा विशेष लेखापरिक्षक, सहकारी संस्था,
६. महालेखापाल १, महाराष्ट्र मुंबई (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
७. महालेखापाल २, महाराष्ट्र नागपूर (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
११. वित्त विभाग (व्यय-२/अर्थसंकल्प-१९),मंत्रालय, मुंबई.
१२. कक्ष अधिकारी (पदुम-१०), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती- कार्यासान ५-स.